**वार्षिक योजना सन २०२४-२५**
**राज्यस्तरीय योजनेअंतर्गत फिरत्या पथकाचे सक्षमीकरण (२४०६ २१६१) या योजने अंतर्गत मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे वन वृत्तातील निर्लेखित केलेल्या ०७ वाहनांच्या बदली त्याच प्रकारातील नविन ०७ वाहने खरेदी करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक: वाहन-२०२५/प्र.क्र.२४/फ-५**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २७ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ :** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : वाहन २०१४/प्र.क्र.३६/१४/विनियम दि.२२ ऑगस्ट, २०१४

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२ दि.१७ एप्रिल, २०१५

३) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१५ व क्र. संकीर्ण-२०१६ /प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१७.०३.२०२२

५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:वाहन-२०२३/प्र.क्र.०५/फ-५ दि. २६ डिसेंबर, २०२३

६) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : वाहन २०२४/प्र.क्र.११/विनियम दि.०२ फेब्रुवारी, २०२४

७) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-८/वाहन/प्र.क्र.१/भाग-६(२०२४-२५)/१३०५, दिनांक १०.०१.२०२५.

८) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) ठाणे यांचे पत्र क्र.कक्ष-८/दक्षता/ वाहन/१२४ /२०२४-२५, दिनांक ०७.०१.२०२५

९) वित्त विभाग, शासन परिपत्रक संकिर्ण २०२४/प्र.क्र.१०१/२४/कोषा-प्रशा ५ दिनांक १७ जानेवारी, २०२५

**प्रस्तावना :**

वन विभागाच्या अधिनस्त विविध कार्यालयासाठी संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये १४४२ वाहनांचा (कार-१३३, जीप-९२२ व इतर विविध प्रकारची ३८७ वाहने) आढावा मंजूर करण्यात आला आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे अधिपत्याखालील राज्य योजनेअंतर्गत फिरत्या पथकाचे सक्षमिकरण योजनेअंतर्गत वाहन आढावा समितीने मान्यता दिलेल्या वाहनापैकी, ठाणे वनवृत्तामधील निर्लेखित केलेल्या ०७ वाहनांच्या बदल्यात त्याच प्रकारातील नवीन ०७ वाहने (१ कार+ ६जीप) खरेदी करण्यासाठी सादर केलेल्या प्रस्तावास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

वन विभागातील वनसंरक्षण व इतर महत्वाची कामे करण्यासाठी जीप, कार, व इतर प्रकारातील विविध वाहने वापरात आहेत. शासनाने ठरवून दिलेल्या मापदंडानुसार वाहने विहित कालमर्यादेनंतर निर्लेखित करण्यात आलेल्या वाहनांच्या बदल्यात त्याच प्रकारातील नवीन वाहने घेण्यात येतात. त्यानुषंगाने संदर्भ क्र.७ व ८ नुसार ठाणे वन वृत्तासाठी राज्य योजनेअंतर्गत फिरत्या पथकाचे सक्षमिकरण योजनेअंतर्गत निर्लेखित केलेल्या ०७ वाहनांच्या बदल्यात त्याच प्रकारातील नवीन ०७ वाहने (१कार+६जीप) खरेदी करण्यास खालील अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे:-

१) निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली यापूर्वी नवीन वाहने खरेदी करण्यात आलेली नाहीत या अटीच्या अधिन राहून, नवीन वाहने खरेदी करण्यात यावीत.

२) संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयामधील तरतुदीच्या अनुषंगाने निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली नवीन वाहने (वाहनाची किमंत + टेंम्परररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभूत साहित्य इत्यादी अंतर्भूत करुन) निश्चित करण्यात आलेल्या वाहन किंमत मर्यादेतच खरेदी करण्यात यावीत.

३) वाहने खरेदी करतांना उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१५ व क्र. संकीर्ण-२०१६/ प्र.क्र.२१५ /उद्योग-४, दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

४) वाहने खरेदी करतांना त्या संबधीच्या नेहमीच्या कार्यपध्दती विषयी नियमांचे आणि इतर सर्व निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी तसेच यामध्ये कोणत्याही प्रकारची अनियमितता आढळल्यास त्याची जबाबदारी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर या कार्यालयाची राहील.

५) वाहन अनुज्ञेय असणाऱ्या अधिकाऱ्यांच्या वापरातील ज्या प्रकारचे वाहन निर्लेखित करण्यात आले आहे, त्या वाहनाऐवजी संबधित पदासाठी त्याच प्रकारचे वाहन अनुज्ञेय राहील.

६) नवीन वाहन खरेदीनंतर त्यांची नोंद महावाहन संगणक प्रणालीवर नोंदविण्यात यावी.

७) वाहन अनुज्ञेय असणाऱ्या एका अधिकाऱ्याच्या वापरात फक्त एकच वाहन असावे.

८) कोणत्याही परिस्थितीत वाहन चालकांची नवीन पदे निर्माण करण्यात येऊ नयेत.

९) निर्लेखित केलेल्या ०७ वाहनांचा तपशिल **विवरणपत्र-अ** मध्ये दर्शविण्यात आला आहे, त्याच वाहनाच्या बदल्यात नवीन ०७ वाहने (१ कार+६ जीप) खरेदी करण्यात यावीत.

२. वाहन खरेदीसाठी लगणा-या निधीबाबत वेगळयाने कळविण्यात येईल.

३. वित्त विभाग, परिपत्रक दि.१७.०१.२०२५ मधील निर्बंधानुसार प्रत्यक्ष वाहन खरेदी पुढील आर्थिक वर्षात करण्यात यावी.

४. सदर शासन आदेश, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४९/व्यय-१०, दि. ३१.०१.२०२५ व क्र.७०७ दि.४.०२.२०२५ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६३/२०२५/विनियम दि.१०.०२.२०२५ क्र.११०२ दि.१३.०२.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन त्याचप्रमाणे वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३० /२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-३, अनु. क्र.३, परिच्छेद १६६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सकेंतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२७१५०३०६६३१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7e3227e15fe5debe28837d6e68d17c1f6e96d1a6dc7f27bc7e0f3ec07bbdfab8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3B1AFE499C80878329FBB017E4922F7356CC5EDC76102E8FF88C7B9A67A322D9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2025.02.27 15:04:09 +05'30'

**( विवेक होशिंग )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) महालेखापाल १/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे
१०) उपवनसंरक्षक, ठाणे वन विभाग, ठाणे /शहापूर/डहाणू
११) विभागीय वन अधिकारी (दक्षता), ठाणे
१२) जिल्हा कोषागार (सर्व)
१३) कार्यासन, व्यय-१०/विनियम, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४) कार्यासन फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६) कार्यासन फ-५ निवड नस्ती, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

शासन निर्णय क्रमांक: वाहन-२०२५/प्र.क्र.२४/फ-५, दिनांक: २७ फेब्रुवारी, २०२५ सोबतचे विवरणपत्र

# विवरणपत्र-अ

वार्षिक योजना सन २०२४-२५

योजनेचे नांव:- फिरत्या पथकाचे सक्षमीकरण (२४०६ २१६१)

| अ.क्र. | मुख्य कार्यालयाचे नांव | अधिनस्त कार्यालयाचे नांव | वाहन वापरणाऱ्या अधिकाऱ्याचे पदनाम | निर्लेखित वाहन क्रमांक | वाहनाचा प्रकार |
|---|---|---|---|---|---|
| १ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.) ठाणे | उप वनसंरक्षक ठाणे वन विभाग, ठाणे | वनपरिक्षेत्र अधिकारी, मुंबई प्रोटोकॉलकामी वापरात) | MH-04-AN - 3222 | जीप |
| २ | | विभागीय वन अधिकारी, (दक्षता) ठाणे | विभागीय वन अधिकारी, (दक्षता) ठाणे | MH-04-AN - 3010 | जीप |
| ३ | | उप वनसंरक्षक शहापूर वन विभाग, शहापूर | वनपरिक्षेत्र अधिकारी (संरक्षण व अतिक्रमण निर्मूलन) शहापूर | MH-04-AN - 3155 | जीप |
| ४ | | उप वनसंरक्षक शहापूर वन विभाग, शहापूर | वनपरिक्षेत्र अधिकारी, फिरते पथक क्र. २, शहापूर | MH-04-AN - 3167 | जीप |
| ५ | | उप वनसंरक्षक डहाणू वन विभाग, डहाणू | वनपरिक्षेत्र अधिकारी, गस्ती पथक चारोटी | MH-04-AN - 3158 | जीप |
| ६ | | उप वनसंरक्षक डहाणू वन विभाग, डहाणू | उप वनसंरक्षक डहाणू वन विभाग, डहाणू | MH-04-C -0019 | **कार** |
| ७ | | उप वनसंरक्षक डहाणू वन विभाग, डहाणू | वनपरिक्षेत्र अधिकारी, गस्ती पथक, दहिसर | MH-04-AN - 3272 | जीप |

*************************